**अहमदनगर-बीड-परळी-वैजनाथ या नवीन रेल्वे मार्गाकरिता रु. ७१.३९ कोटी निधी वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. आरएलवाय-०९०९/प्र.क्र.२४४ (भाग-२)/परिवहन-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १४ मार्च, २०१७.

**वाचा :** १) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०९०९/१०५८/प्र. क्र. २१३/परि-५, दि.२३.१२.२००९
२) गृह विभाग शासन निर्णय क्र. आरएलवाय-०११३/७९८/प्र.क्र.२/२०१३/परि-५, दि.१०.६.२०१५.
३) मुख्य प्रशासकीय अधिकारी (निर्माण),मध्य रेल्वे, मुंबई यांचे पत्र क्र. EW/166/BA/BG/2016-17, दि. ७.२.२०१७.
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र. क्र. ८९/अर्थ-३, दि.८.२.२०१७

**प्रस्तावना :**

अहमदनगर-बीड-परळी-वैजनाथ या नवीन रेल्वेमार्गाकरिता रू. २८२६.०० कोटी एवढा खर्च अंदाजित असून उक्त खर्चापैकी रू.१४१३.०० कोटी एवढा ५०% हिस्सा राज्य शासनाकडून केंद्रीय रेल्वे बोर्डास उपलब्ध करून देण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतला आहे. त्यानुसार सदर रेल्वे मार्गाकरिता राज्य शासनाने जानेवारी २०१७ अखेरपर्यंत एकूण रू.५६८.२५ कोटी इतका निधी उपलब्ध करून दिलेला आहे. या रेल्वे प्रकल्पाकरिता याच कालावधीत रेल्वे विभागाने रु.६३९.६४ कोटी इतका निधी वितरीत केलेला आहे. रेल्वे मंत्रालयाच्या हिश्श्याच्या समरुप राज्य शासनाचा हिस्सा करणेसाठी रु. ७१.३९ कोटी इतकी रक्कम वितरीत करणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी (Financial Adviser and Chief Accounts Officer (Construction) Mumbai CST), मध्य रेल्वे, छत्रपती शिवाजी टर्मिनस, मुंबई ४०० ००१ यांना प्रस्तावनेत नमूद प्रयोजनासाठी रु.७१.३९ कोटी (रु. एकाहत्तर कोटी एकोणचाळीस लक्ष फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास राज्य शासन या निर्णयाव्दारे मंजूरी देत आहे.

२. शासनाने उप सचिव (परिवहन), गृह विभाग यांना नियंत्रण अधिकारी व शासनाच्या अवर सचिव, रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित केले असून, या शासन निर्णयाव्दारे त्यांना सदर रक्कम प्रदान करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी येणारा खर्च सन २०१६-१७ या वर्षात मागणी क्र.बी-७, ३००१ भारतीय रेल्वे धोरण निश्चिती संचालन, संशोधन व इतर संकीर्ण संघटना, (००) ८०० इतर खर्च (००) (०२) रेल्वे प्रकल्पामध्ये राज्य शासनाचा सहभाग (३००१००५४) ३२ अंशदाने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दि. २०.४.२०१६ सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सदर देयकांन्वये आहरीत करण्यात येणा-या रक्कमेचे स्वरुप “अंशदाने” या तपशीलवार शिर्षाखाली येते. त्यानुसार तपासणी करावयाच्या सूचित नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तींचे तसेच उक्त शासन निर्णयाच्या परिच्छेद ७ ते १८ मधील अटी व शर्तींचे पालन करण्यात आले आहे.

५. प्रमाणित करण्यात येते की, शासन शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०.४.२०१६ सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील १ ते १० तसेच शासन परिपत्रकातील ७ ते १८ अटींची पूर्तता होत आहे.

६. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०.४.२०१६ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागांना देण्यात आलेल्या अधिकारानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३१४१५०५२००६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2017.03.14 15:14:35 +05'30'

**( द. ह. कदम )**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग**

**प्रति,**

१) महालेखापाल, १ व २ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
२) सचिव, केंद्रीय रेल्वे बोर्ड, रेल्वे मंत्रालय, रेल भवन, नवी दिल्ली.
३) महाव्यवस्थापक, मध्य रेल्वे, मुंबई / दक्षिण मध्ये रेल्वे, सिकंदराबाद.
४) वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, मध्य रेल्वे, छत्रपती शिवाजी टर्मिनस, मुंबई.
५) मुख्य प्रशासनीक अधिकारी (निर्माण), मध्य रेल्वे, छत्रपती शिवाजी टर्मिनस, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
८) अवरसचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग (व्यय-८ अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई.

१०) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई.

११) रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर रक्कमेचा धनादेश Financial Adviser and Chief Accounts Officer (Construction), Mumbai CST यांच्या नावाने काढण्यात यावा.

१२) निवड नस्ती, परिवहन -५

**प्रत- माहितीकरिता**

१) मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा.प्रधानसचिव (परिवहन व बंदरे) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

***